सन २०१७-१८ या वित्तिय वर्षात राष्ट्रीय रुरबन अभियानांतर्गत प्राप्त झालेला केंद्र हिस्सा व त्याअनुषंगाने समरुप राज्य हिस्यापैकी प्राप्त निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एनआरएम-२०१७/प्र.क्र. ९३/योजना-४**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मुंबई-४०० ००१

दिनांक: ७ जुलै, २०१७

वाचा-१) या विभागाचा शासन निर्णय क्र. एनआरएम २०१६/प्र.क.०१/योजना ०४ दि. १४ जानेवारी, २०१६.

२) या विभागाचा शासन निर्णय क्र. एनआरएम २०१६/प्र.क.१२/योजना ०४ दि. ६ जुलै, २०१७.

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय रुरबन अभियानांतर्गत केंद्र शासनाकडून पहिल्या टप्प्यातील गावसमुहाच्या विकासासाठी उणिवा निवारण निधीमधून (CGF) केंद्र हिस्याच्या ६०% रक्कमेपैकी रुपये २२,२३,००.०००/- ( रु.बावीस कोटी तेवीस लक्ष फक्त ) उपलब्ध करुन दिले आहेत. त्याअनुषंगाने समरुप राज्य हिस्याच्या ४० % निधीपैकी रक्कम रुपये १४,८२,००.००० ( रु.चौदा कोटी ब्याऐंशी लक्ष फक्त ) इतका निधी शासनाच्या बी.डी.एस. प्रणाली वर उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदरचा निधी हा गावसमुहाच्या विकासासाठी संबंधित जिल्हयांना वितरीत करावा लागणार आहे.

(रुपये कोटीमध्ये)

| केंद्र हिस्सा | | राज्य हिस्सा | |
|---|---|---|---|
| लेखा शिर्ष | वितरीत करावयाची रक्कम | लेखा शिर्ष | वितरीत करावयाची रक्कम |
| मागणी क्र. एल-३, २५१५, इतर ग्राम विकास कार्यक्रम, १०६, ग्रामीण भागातील नागरी सुविधांसाठी तरतूद, (००)(०१) राष्ट्रीय रुरबन अभियान गांव समूहांचा विकास (केंद्र हिस्सा ६० %) , ३३ अर्थसहाय्य , कायमचा सांकेतांक (सी.आर.सी.) २५१५२५३९ | २२.२३ | २५१५, इतर ग्राम विकास कार्यक्रम, १०६, ग्रामीण भागातील नागरी सुविधांसाठी तरतूद, (००)(०१) राष्ट्रीय रुरबन अभियान गांव समूहांचा विकास (राज्य हिस्सा ४० %) , ३३ अर्थसहाय्य कायमचा सांकेतांक (सी.आर.सी.) २५१५२५४८ | १४.८२ |

२. राज्य व्यवस्थापन कक्षाची स्थापना तसेच त्याअनुषंगाने पद निर्मितीची कार्यवाही होईपर्यंत, वितरीत करण्यात येणा-या निधीसबंधात मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांनी आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पहावे.

३. वर नमुद केल्याप्रमाणे केंद्र व राज्य हिस्याची रक्कम कोषागार कार्यालयातून काढण्यात आल्यानंतर या विभागाच्या राष्ट्रीय रुरबन अभियानाच्या राज्यस्तरावर उघडण्यात आलेल्या खालील बचत खात्यात जमा करण्यात यावी.

| बँकेचे नांव व शाखा | खात्याचा क्रमांक | खात्याचे नाव | NEFT/IFSC CODE |
|---|---|---|---|
| बँक ऑफ महाराष्ट्र , शाखा- मंत्रालय, मुंबई | ६०२४२९९०९२४ | रुरबन मिशन महाराष्ट्र | MAHB०००१३८८ |

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक २९०/२०१७/व्यय-१५, दि.२६-५-२०१७ , व २६५/अर्थोपाय, दि. १२-०६-२०१७ आणि २१२/अर्थ-१७ दि. १६-०६-२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या प्राप्त झालेल्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०७१६५८२१४९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Mahadev Gengaje

Digitally signed by Rajendra Mahadev Gengaje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aadac6f62a04dc76f59a0a873d1263c7d14f6ea5080bb750bf392303a1a35907, cn=Rajendra Mahadev Gengaje
Date: 2017.07.07 17:14:01 +05'30'

(रा. म. गेंगजे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, पालघर.
३. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा पालघर.

४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा पालघर.

५. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

६. वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ-१७) मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

७. कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१

८. निवडनस्ती.